**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस २०१३/प्र.क्र.८३/रस्ते-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ जुलै २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांक-खाक्षेस-२००८/प्र.क्र.८३/रस्ते-९, दिनांक ३० जुलै २००९.**

प्रस्तावना -

सार्वजनिक खाजगी सहभाग धोरणामध्ये एकसूत्रता आणण्याच्या दृष्टीने व या धोरणानुसार हाती घ्यावयाच्या प्रकल्पांची व्याप्ती, दोन पथकर स्थानकांमधील अंतर, उपभोक्ता शुल्काचे दर, वाहनांचा प्रकार, इत्यादी निकषांसह कालपरत्वे धोरण निश्चित करणे आवश्यक आहे. महाराष्ट्र शासनाने सार्वजनिक खाजगी सहभागासंबंधीचे धोरण प्रथमत: दिनांक २७ जून २००० रोजी प्रसिध्द केले. त्यानंतर दिनांक ९ जानेवारी २००३ व दिनांक ३० जुलै २००९ रोजी, या धोरणामध्ये सुधारणा करण्यात आल्या. सध्या दिनांक ३० जुलै २००९ रोजी प्रसिध्द केलेले सार्वजनिक खाजगी सहभागाचे धोरण प्रचलित आहे. या बाबतीत क्षेत्रीय स्तरावर उद्भवलेल्या अडचणी विचारात घेऊन शासनाने वेळोवेळी परिपत्रके व मार्गदर्शक सूचना आवश्यकतेप्रमाणे निर्गमित केल्या आहेत. आतापर्यंत निर्गमित करण्यात आलेले शासन निर्णय, परिपत्रके, मार्गदर्शक सूचना, सार्वजनिक खाजगी सहभाग धोरणासंबंधी शासन स्तरावर झालेल्या चर्चा, शासनाकडे प्राप्त झालेल्या सूचना / अहवाल विचारात घेऊन सार्वजनिक खाजगी सहभागाच्या धोरणामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. उक्त सुधारणा विचारात घेऊन शासनाने दिनांक ३० जुलै २००९ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन, सार्वजनिक खाजगी सहभाग धोरण - २०१४ खालीलप्रमाणे निर्गमित करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय -

**१. अर्थसंकल्पातून पूर्ण करण्यात येणा-या राज्य योजनांतर्गत प्रकल्पांवर उपभोक्ता शुल्काची आकारणी करण्यात येणार नाही.**

**२. (I) रु. २०० कोटी पेक्षा कमी किंमत असलेल्या रस्त्यांच्या प्रकल्पांकरिता उपभोक्ता शुल्क आकारण्यात येणार नाही.**

**(II) भुयारी मार्ग, नदीवरील पुल, सागरी सेतु, उड्डाणपूल, उन्नत मार्ग, द्रुतमार्ग, रेल्वे उड्डाणपूल, रेल्वेखालून जाणारे मार्ग आणि वळण रस्ते यांसारख्या एकूण प्रकल्प किंमत रु. २०० कोटीपेक्षा कमी अंदाजित किंमतीच्या प्रकल्पाकरिता उपभोक्ता शुल्काची आकारणी करण्यात येणार नाही.**

खाजगीकरणांतर्गत हाती घेण्यासाठी मंजूर रस्ते विकास योजनेत अंतर्भूत असलेल्या प्रकल्पाची निवड करावी. मंजूर रस्ते विकास योजनेत अंतर्भूत नसलेला अथवा एखादा विशेष प्रकल्प हाती घ्यावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे बंधनकारक राहील.

वाहतूक वर्दळ व एकत्रित पायाभूत विकासाची निकड विचारात घेऊन प्रकल्पाचे प्राधान्य ठरविण्यात येईल.

**३. एकूण प्रकल्प किंमत (TPC) आणि एकत्रित प्रकल्प किंमत (OPC):**

(I) एकत्रित प्रकल्प किंमतीमध्ये प्रकल्पाची बांधकाम किंमत, आकस्मिक खर्च, प्रकल्प कर्जावरील अनूषंगिक व्याज, दरवाढ आणि प्रकल्पाशी संबंधित इतर खर्चांचा (प्रकल्पाचे सर्वेक्षण, प्रकल्प अहवाल तयार करणे, प्रशासकीय खर्च, आस्थापना खर्च, वित्तीय खर्च, सल्लागार शुल्क खर्च, भूसंपादन, सेवा वाहिन्या स्थलांतरीत करणे, सुरु असलेला प्रकल्पाचा परतावा, इत्यादि) समावेश असावा.

(II) एकूण प्रकल्प किंमत (TPC) व एकत्रित प्रकल्प किंमत (OPC) काढावयाची पध्दत -

| Sr. No. | Items |
|---|---|
| १. | Construction Cost |
| २. | Contingencies (३% of Construction Cost) |
| ३. | **Engineering Procurement Cost (EPC) = (१+२)** |
| ४. | Independent Engineer Charges/Pre-operative Expenses(१% of EPC) |
| ५. | Financing Charges (२% of Debt) |
| ६. | Price Escalation during Construction (upto ५% per year) |
| ७. | Interest During Construction (IDC) |
| ८. | **Total Project Cost (TPC) = (३+४+५+६+७) (For deciding financial viability)** |
| ९. | Land Acquisition, Utility Shifting and Prevalent Toll Buyback Cost and any other cost incidental to the project, etc. |
| १०. | **Overall Project Cost = (८+९)** |

(III) बांधकाम किंमतीनुसार (Construction Cost) बांधकाम कालावधी हा सर्वसाधारणतः खालीलप्रमाणे -

| अ.क्र. | बांधकाम किंमत | बांधकाम कालावधी |
|---|---|---|
| १. | रु. २०० कोटी ते रु. ३०० कोटी | २ वर्षे |
| २. | रु. ३०० कोटीपेक्षा अधिक | २ वर्षे ६ महिने ते ३ वर्षे |

वर नमूद केलेला कालावधी हा फक्त मार्गदर्शनपर आहे. मुख्य अभियंता यांनी प्रकल्पाची व्याप्ती व त्यात अंतर्भूत करण्यात आलेल्या निरनिराळ्या तरतुदी विचारात घेऊन प्रकल्पाचा बांधकाम कालावधी निश्चित करावा.

(IV) खाजगीकरणांतर्गत रस्त्याचे प्रकल्प प्रस्तावित करताना त्या प्रकल्पात अंतर्भूत असलेल्या लांबीचे संकल्पित आयुष्य भारतीय रस्ते महासभा (आय.आर.सी.) मानकांमधील तरतूदींवर आधारित असावे. संकल्पित आयुष्य संपल्यानंतर सदरहू पूर्ण लांबीमध्ये आवश्यक तेथे मजबुतीकरण व संपूर्ण लांबीतील नूतनीकरण, इत्यादी बाबींचा खर्च रोकड प्रवाहामध्ये योग्य त्या वर्षी घेण्यात यावा. सदर खर्च अंदाजे किती असावा याबाबतची तरतूद प्रकल्प अहवालात करण्यात यावी. तसेच सवलत कालावधीमधील दरवर्षी करावयाची सर्वसाधारण दुरुस्ती (Current Repairs) आणि प्रत्येक सहाव्या वर्षी करावयाची विशेष दुरुस्ती (Special Repairs) अंतर्गत डांबरी पृष्ठभागाचे नूतनीकरण यासाठी लागणारा खर्च स्वतंत्रपणे परिगणित करावा. याबाबतची परिगणना सुसाध्यता अहवालामध्ये सविस्तर देण्यात यावी. असा खर्च रोकडप्रवाहामध्ये योग्य त्या वर्षी दर्शविण्यात यावा. तसेच उद्योजकाने प्रकल्प शासनास हस्तांतरीत करण्यापूर्वी संपूर्ण रस्ते लांबीचे नूतनीकरण करण्याची तरतूद प्रस्तावात समाविष्ट करावी. आवश्यकतेनूसार कॉंक्रीट रस्त्यामधील सदोष पॅनेलस्ची दुरुस्ती तसेच पुल, सीडी वर्क्स, रिटेनिंग वॉल, पथकर स्थानक इत्यादि बांधकामाची (Structures) दुरुस्ती ही भारतीय रस्ते महासभा (आय.आर.सी.) मानकानूसार करण्याची तरतूद प्रस्तावात समाविष्ट करावी. याबाबतची सविस्तर आकडेमोड ही सुसाध्यता अहवालासोबत सादर करण्यात यावी.

(V) खाजगीकरणांतर्गत प्रकल्प प्रस्ताव तयार करताना रस्त्याची भौमितिक सुधारणा भारतीय रस्ते महासभेच्या (आय.आर.सी.) मानकाप्रमाणे विचारात घ्यावी जेणेकरुन सुरक्षित प्रवास करणे सोईचे जाईल. रस्ते सुरक्षा ऑडिट (Road Safety Audit) हे प्रकल्पाचे बांधकाम सुरु करताना, बांधकाम पूर्ण झाल्यानंतर आणि सवलत कालावधी संपेपर्यत प्रत्येक वर्षी करण्यात यावे.

(VI) आवश्यक चिन्ह फलक, माहिती फलक, सुचना फलक इत्यादि (Complete Inventory) यांची विस्तृत संकल्पने आय.आर.सी. मानकाप्रमाणे करावी. सदर बाबींचा समावेश प्रकल्प प्रस्तावात करावा.

(VII) उद्योजकाने स्वतंत्र अभियंता व कार्यकारी अभियंता यांच्या उपस्थितीमध्ये प्रत्येक वर्षी डिसेंबर महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यामध्ये रफनेस इन्डेक्स सर्व्हे करावा आणि या अनुषंगाने आवश्यक असलेले मजबूतीकरणासह डांबरीकरण / दुरुस्ती प्रत्येक वर्षी २५ एप्रिल पूर्वी पूर्ण करावी. सदर दुरुस्ती ही नियतकालीन नूतनीकरणापेक्षा (Periodic Renewal) भिन्नपणे करावयाची आहे. तसेच सवलत करारनाम्यामध्ये विहीत केलेला दर्जा राखण्याच्या दृष्टीने पावसाळ्यापूर्वी करावयाची कामे उद्योजकाने प्रत्येक वर्षी १५ मे च्या अगोदर पूर्ण करावी.

(VIII) पथकर स्थानक चालविण्याकरिता लागणा-या प्रशासकीय खर्चाची परिगणना स्वतंत्ररित्या करण्यात यावी. त्यानुसार रोकड प्रवाहामध्ये त्याचा समावेश व्हावा. याबाबतची सविस्तर परिगणना प्रकल्पाच्या सुसाध्यता अहवालासोबत सादर करण्यात यावी. सुसाध्यता अहवालामध्ये प्रशासकीय कार्यालय, तक्रार केंद्र, प्रसाधन गृह, वाहन तळ, वजन काटा,

नादुरुस्त वाहने हलविण्यासाठी यारी ठेवण्यासाठी जागा, पिण्याच्या पाण्याची सोय, पोलीस चौकी इमारत, प्रकाश व्यवस्था, माहिती फलक व इतर चिह्नांचे फलक, बस बे, ट्रक बे, इत्यादि बाबींची सविस्तर आकडेमोड व सविस्तर नकाशे सादर करण्यात यावे.

(IX) प्रकल्प हाती घेण्यापूर्वी राईट ऑफ वे (ROW) संपूर्णपणे शासनाच्या ताब्यात असावा. तसेच अतिरिक्त जमीन आवश्यक असल्यास प्रकल्प कार्यान्वित करतेवेळी खात्याचे ताब्यात जागा मिळेल या दृष्टीने भूसंपादनाची कार्यवाही पूर्वनियोजित पध्दतीने योजण्यात यावी. प्रकल्प बांधकाम सुरु करण्यापूर्वी सदर कार्यवाही पूर्ण करण्यात यावी जेणेकरुन प्रकल्पाचे काम रेंगाळणार नाही.

(X) प्रकल्प सुरु करण्यापूर्वी जलवाहिन्या, मलवाहिन्या, विद्युत वाहिन्या, दूरध्वनी वाहिन्या, गॅस वाहिन्या, इंधन वाहिन्या इत्यादि योग्य ठिकाणी स्थलांतरित करण्याबाबत पुरेशी दक्षता घेण्यात यावी. सदर तरतूदी सक्षम प्राधिका-याकडून प्रमाणित करण्यात याव्या.

(XI) गावातून/शहरी भागातून जाणा-या रस्त्याचा भाग हा शक्यतोवर संपूर्णपणे कॉक्रीटचा असावा. तसेच संपूर्ण रुंदीत सुधारणा करावी. पदपथासह आवश्यकतेनुसार भुयारी मार्ग, गटारे, सेवावाहिन्यांसाठी डक्टस् (Ducts), इत्यादीसाठी सुयोग्य तरतूद करण्यात यावी. आवश्यक असल्यास वळणमार्ग बांधकामासाठी तरतुद करावी.

(XII) गाव / शहरामध्ये रस्त्यालगत आवश्यक तेथे जागेच्या उपलब्धतेनुसार सेवा रस्त्याची (Service Roads) तरतूद करण्यात यावी.

(XIII) रस्त्याच्या मध्य दुभाजकाची रुंदी व उंची आय.आर.सी. मानकाप्रमाणे ठेवण्यात यावी.

(XIV) भविष्यात वाढणा-या वाहन संख्येचा विचार करुन पथकर स्थानकावर वाहनधारकांकडून उपभोक्ता शुल्क वसुलीस लागणारा विलंब टाळण्यासाठी पथकर स्थानकाचे संकल्पन करावे व प्रकल्प प्रस्तावात त्यानुसार पथकर स्थानकाचा नकाशा समाविष्ट करावा.

(XV) प्रकल्पामधील सर्व तरतूदी भारतीय रस्ते महासभेच्या (आय.आर.सी.) मानका प्रमाणे असाव्या. सदर तरतुदीमध्ये कोणतेही विचलन असल्यास त्याबाबत सुसाध्यता अहवालामध्ये नमूद करण्यात यावे.

## ४. प्रकल्पाच्या सुसाध्यतेसाठी वाहतुकीचा अभ्यास :

(I) खाजगीकरणांतर्गत प्रस्तावित प्रकल्पातील नियोजित पथकर स्थानकाच्या ठिकाणी, प्रकल्प प्रशासकीय मान्यतेस्तव पाठविण्यापूर्वी सलग सहा महिने कालावधीसाठी तसेच प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर सलग सहा महिने कालावधीसाठी, डिजिटल पध्दतीने आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन स्वतंत्र तज्ञ यंत्रणेकडून वाहतूक गणना सर्वेक्षण करण्यात यावे. ज्या प्रकल्पांना यापूर्वी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे अशा प्रकल्पांसाठी सुध्दा निविदा निश्चिती होईपर्यंतच्या कालावधीमध्ये डिजिटल पध्दतीने सलग वाहतूक गणना सर्वेक्षण करण्यात यावे.

(II) डिजिटल वाहतूक गणना सर्वेक्षणासाठी ATCC (Automatic Traffic Count Classifier) व आवश्यकतेनूसार व्हिडिओ रेकॉर्डीग कॅमेरा (Automatic) पध्दत अवलंबावी.

(III) वाहतूक गणना सर्वेक्षणामध्ये आवश्यकतेप्रमाणे Classified Volume Traffic Count, OD Survey, Number Plate Survey, Turning Movement Survey व Pedestrain/Cattle Pass Survey इत्यादि बाबींचा अंतर्भाव करावा.

(IV) वाहतूक गणना सर्वेक्षण अहवालामध्ये पथकर धोरणानुसार पथकरामध्ये सूट असलेल्या वाहनांमुळे पथकरात होणारी घट याची एकूण टक्केवारी सविस्तर नमूद करावी. सदर टक्केवारीनुसार पथकरात होणारी घट रोकड प्रवाहात विचारात घेण्यात यावी.

(V) भारतीय रस्ते महासभा (आय.आर.सी.) मानकानूसार व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेनूसार सविस्तर वाहतूक गणना सर्वेक्षण अहवाल तयार करावा.

(VI) वाहतूक गणना सर्वेक्षणाच्या वरील सर्व बाबींवरील नियंत्रण (Monitoring) हे किमान अधीक्षक अभियंता दर्जाच्या अधिका-याकडून करण्यात यावे.

**५. सवलत कालावधीतील वाहतूक गणना :**

(I) सवलत कालावधीमध्ये डिजिटल पध्दतीने वाहतूक गणना करण्यात यावी.

(II) पथकर स्थानकाजवळ स्वयंचलित वाहतूक गणना प्रणाली उभारण्यात यावी. सदर वाहतूक गणना स्वतंत्र तज्ञांमार्फत करण्यात यावी.

(III) वाहतूक गणनेच्या सर्व बाबींवर परिच्छेद (४) पोट कलम (II ते V) मध्ये विहित केल्याप्रमाणे नियत्रंण (Monitoring) हे किमान अधीक्षक अभियंता दर्जाच्या अधिका-याकडून करण्यात यावे.

**६. आर्थिक विश्लेषण (प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी विचारात घ्यावयाच्या सर्वसाधारण बाबी) :**

(I) वाहतूक वर्दळीबाबतची अचूक माहिती उपलब्ध नसल्यास प्रकल्प अहवाल तयार करताना वाहतूक वर्दळीमध्ये सर्वसाधारणत: संपूर्ण सवलत कालावधीकरिता ५ टक्के प्रतिवर्षी वाढ विचारात घेण्यात यावी.

(II) दरवर्षी प्रकल्पावर होणारा सर्वसाधारण देखभाल व दुरुस्तीचा खर्च बांधकाम किंमतीच्या खालीलप्रमाणे गृहीत धरण्यात यावा.

पुलांच्या कामासाठी : पुलाच्या किंमतीच्या ०.५ %
रस्त्यांच्या कामासाठी : रस्त्याच्या किंमतीच्या (प्रमुख पूल वगळून) १ %

(III) प्रकल्पावर होणारा विशेष दुरुस्तीचा खर्च सर्वसाधारणपणे दर सहाव्या वर्षी, प्रकल्प बांधकामाच्या किंमतीच्या खालीलप्रमाणे विचारात घेण्यात यावा.

पुलांच्या कामासाठी : ३%

रस्त्यांच्या कामासाठी : ६%

विशेष दुरुस्तीअंतर्गत नूतनीकरणाची तरतुद करताना मुख्य अभियंता यांनी नूतनीकरणासाठी आवश्यक संकल्पन करुन त्यासाठी लागणारी किंमत रोकडप्रवाहात (Cash Flow) तसेच प्रकल्प अहवालात (DPR) समाविष्ट करावी. डांबरी पृष्ठभागाचा खडबडीतपणा (Roughness Index) सवलत करारनाम्यात निश्चित केलेल्या खडबडीतपणाच्या निर्देशांकापेक्षा (Roughness Index) जास्त झाल्यानंतर किंवा ६ वर्षे यापैकी जो कालावधी आधी येईल, त्यावेळी नूतनीकरण करणे उद्योजकास बंधनकारक राहिल अशी तरतुद निविदेत समाविष्ट करण्यात यावी.

(IV) उपभोक्ता शुल्क वसुली व आस्थापना खर्च :

| | | | |
|---|---|---|---|
| १) | उपभोक्ता शुल्क उत्पन्न प्रतिमाह रु. २५ लक्ष पर्यंत | : | मासिक उपभोक्ता शुल्क उत्पन्नाच्या ७.५ टक्के किंवा किमान रु. १ लक्ष |
| २) | उपभोक्ता शुल्क उत्पन्न प्रतिमाह रु. २५ लक्ष ते १ कोटी | : | मासिक उपभोक्ता शुल्क उत्पन्नाच्या ५.० टक्के किंवा किमान रु. १.८७५ लक्ष |
| ३) | उपभोक्ता शुल्क उत्पन्न प्रतिमाह रु. १ कोटीपेक्षा जास्त | : | मासिक उपभोक्ता शुल्क उत्पन्नाच्या २.५ टक्के किंवा किमान रु. ५ लक्ष |

वरील तरतूदी मार्गदर्शनपर आहेत. मुख्य अभियंता यांनी प्रकल्पाची व्याप्ती विचारात घेऊन योग्य त्या तरतूदींचा समावेश प्रस्तावात करावा.

(V) वारंवार प्रवास करणाऱ्या वाहनांसाठी कुपन्स, परतीचा पास, दैनिक पास, मासिक पास, स्थानिक पास इत्यादि सवलती देण्यात येतात. तसेच काही वाहनांना पथकरातून सूट देण्यात येते. यामुळे पथकर उत्पन्नावर परिणाम होतो. या बाबी विचारात घेऊन पथकर उत्पन्नामध्ये कमाल १६% घट विचारात घेण्यात यावी.

**७. उत्पन्नाचे स्त्रोत :**

(I) शासनाने विनिर्दिष्ट केलेल्या वाहनांवर निविदेतील मंजूर पथकर स्थानकावर अधिसूचनेतील दराप्रमाणे मंजूर सवलतीच्या कालावधीसाठी उपभोक्ता शुल्क वसुली.

(II) आवश्यकतेनुसार प्रकल्प लांबीत प्रदान करण्यात आलेले जाहिरातीचे हक्क.

(III) शासनाने मंजूर केलेला जमिनीचा विकास किंवा इतर कोणताही उत्पन्नाचा स्त्रोत.

**८. पथकर स्थानक निश्चिती :**

(I) वाहनधारकाकडून उपभोक्ता शुल्क वसुलीस लागणारा विलंब टाळण्यासाठी पथकर स्थानकाचे सुयोग्य संकल्पन करावे.

(II) सर्व बाबी विचारात घेऊन संबंधित मुख्य अभियंता यांनी नकाशासह नियोजित उपभोक्ता शुल्क वसुली स्थानकाच्या ठिकाणाची शिफारस करावी व शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावे.

सर्वसाधारणत: मंजूर सवलत कालावधीमध्ये पथकर स्थानकाच्या ठिकाणामध्ये कोणताही बदल करण्यात येऊ नये.

(III) एकाच रस्त्यावरील दोन पथकर स्थानकामधील अंतर ४५ कि.मी. पेक्षा कमी नसावे. प्रकल्पाच्या सुसाध्यतेनुसार एकाच रस्त्यावर दोन किंवा दोन पेक्षा अधिक पथकर स्थानकावर उपभोक्ता शुल्क वसुली करता येऊ शकेल.

(IV) खाजगीकरणांतर्गत नजीकच्या दोन किंवा दोनपेक्षा अधिक स्वतंत्र रस्त्यावर कामे करण्यात आली असतील तर त्या प्रकल्पांच्या कोणत्याही दोन पथकर स्थानकामधील अंतर २० कि.मी. पेक्षा कमी नसावे.

(V) निरनिराळया दर्जाचे रस्ते एकत्रित विकास प्रकल्पाकरिता (Cluster Development Project) एकापेक्षा जास्त ठिकाणी उपभोक्ता शुल्क लावता येईल. याकरिता पथकर स्थानकांची संख्या व ठिकाणे प्रकल्पाच्या सुसाध्यतेवर अवलंबून राहतील. तथापि पथकर स्थानके महानगरपालिकेच्या हद्दीबाहेर किमान ५ कि.मी. अंतरावर, नगर पालिका हद्दीबाहेर किमान ३ कि.मी. अंतरावर आणि गाव हद्दीबाहेर किमान १ कि.मी. अंतरावर असावे. ही अट निव्वळ वळण रस्त्यांकरिता, एकत्रित रस्ते विकास योजना (आय.आर.डी.पी.) व शहरांशी संबंधित अन्य प्रकल्पांकरिता लागू राहणार नाही.

## ९. प्रत्येक पथकर स्थानकावर द्यावयाच्या किमान सोयी-सुविधा :

(I) महाराष्ट्र शासनाने मंजूर केलेल्या प्रमाणित नमुन्यातील इलेक्ट्रॉनिक स्वरूपातील पावती रस्त्याचा वापर करणा-यास उपभोक्ता शुल्क रोख अदा केल्यानंतर देण्यात येईल. इलेक्ट्रॉनिक स्वरूपातील पावतीशिवाय उद्योजकास उपभोक्ता शुल्क गोळा करता येणार नाही. इलेक्ट्रॉनिक स्वरूपातील पावतीवर देण्यात येणारी किमान माहिती खालीलप्रमाणे देण्यात यावी.

| **उपभोक्ता शुल्क पावती** | |
|---|---|
| पावती क्रमांक : | दिनांक: वेळ: |
| शासन अधिसूचना क्रमांक व दिनांक | |
| प्रकल्पाचे नाव | |
| उद्योजकाचे / विशेष प्रयोजन संस्थेचे (एस.पी.व्ही.) नाव | |
| प्रकल्पाची लांबी | |
| पथकर स्थानकाचे ठिकाण | |
| वाहनाचा प्रकार | |
| उपभोक्ता शुल्क (User Fee) | |

(II) अ) प्रत्येक पथकर स्थानकाजवळ दोन्ही बाजूला पुरुष तसेच महिलांसाठीची स्वच्छ पोचमार्गासह स्वतंत्र स्वच्छतागृहे असतील व त्यामध्ये पाण्याची २४ तास व्यवस्था असेल. दोन मार्गिकेच्या रस्त्यावर पुरुष व महिलांसाठी प्रत्येकी किमान ४ व चार मार्गिकेच्या रस्त्यावर पुरुष व महिलांसाठी प्रत्येकी किमान ६ स्वच्छतागृहे असावी.

ब) स्वच्छतागृहे नेहमी स्वच्छ व सुस्थितीत ठेवण्यात यावी.

क) स्वच्छतागृहांसाठी पुरुष व महिलांसाठी स्वतंत्र प्रवेशाची तसेच योग्य व स्वच्छ पोच मार्गाची सोय असावी.

ड) स्वच्छतागृहासंबंधीची माहिती देणारे फलक योग्य त्या ठिकाणी उभारण्यात यावे.

(III) रस्त्याच्या दोन्ही बाजूला स्वच्छतागृहाजवळ किमान पाच वाहने उभी करण्याची व्यवस्था असावी.

(IV) रस्त्याच्या दोन्ही बाजूला पथकर स्थानकाजवळ पिण्याच्या पाण्याची पुरेशी व्यवस्था असावी.

(V) रस्त्याच्या दोन्ही बाजूला रस्त्याचा वापर करणा-यांसाठी सर्व पथकर स्थानकांवर तक्रार पेटी/तक्रार पुस्तक ठेवण्यात यावे. प्राप्त झालेल्या तक्रारींची यादी करण्यात यावी व प्राप्त झालेल्या तक्रारीचे निवारण त्वरीत करण्याची दक्षता घ्यावी. उद्योजकाने प्राप्त झालेल्या तक्रारी व त्याबाबत करण्यात आलेली कार्यवाही याचा गोषवारा प्रत्येक महिन्यात कार्यकारी अभियंता यांचेकडे सादर करावा. प्रत्येक पथकर स्थानकावर तक्रार अर्ज स्वीकारण्यासाठी आवश्यक खिडकीसह (Counter) कर्मचा-याची व्यवस्था असावी.

(VI) पथकर स्थानकाच्या दोन्ही बाजूस किमान १०० मीटर अंतरापर्यन्त सीमेंट कॉंक्रीटची फरसबंदी घालण्यात यावी.

(VII) पथकर स्थानकावर RFID / E-tag ची तरतुद करण्यात यावी व त्याकरीता स्वतंत्र मार्गिका ठेवण्यात यावी.

(VIII) उपभोक्ता शुल्क भरण्यास सूट दिलेल्या वाहनांना पथकर स्थानकातून जाण्यासाठी व येण्यासाठी स्वतंत्र मार्गिकेची (Dedicated Lane) ची तरतूद करण्यात यावी.

(IX) प्रत्येक पथकर स्थानकावर रस्त्याच्या दोन्ही बाजूला उपभोक्ता शुल्क लागू नसलेली वाहने जसे स्कूटर, रिक्षा, सायकल व पादचारी, इत्यादि यांच्यासाठी स्वतंत्र मार्गिका ठेवावी.

(X) मार्गिकेची (Lane) शिस्त पाळण्याबाबत ठिकठिकाणी सूचना फलक बसविण्यात यावे.

(XI) सर्व पथकर स्थानकांवर प्रथमोपचार पेटी ठेवावी व ती गरजेच्या वेळी वापरता येण्याच्या स्थितीत असावी.

(XII) पथकर स्थानकावर काम करणारे कर्मचारी/कामगार यांचेबाबत खालील निकषांची पूर्तता करण्याची उद्योजकाने खात्री करावी.

अ) सदर कर्मचारी/कामगार याचे वय १८ वर्षांपेक्षा कमी नसावे व तो/ती किमान दहावी उत्तीर्ण असावा.

ब) पथकर स्थानकावर काम करणा-या कर्मचारी/कामगार यांच्या चारित्र्याचे प्रमाणपत्र संबंधित पोलीस ठाण्याकडून प्राप्त करुन ते पथकर स्थानकावर ठेवावे. असे प्रमाणपत्र असल्याशिवाय उद्योजकास उपभोक्ता शुल्क गोळा करण्यास परवानगी देण्यात येऊ नये.

क) कर्मचा-यांना प्रकल्पावरील कार्यकारी अभियंत्याकडून ओळखपत्र देण्यात यावे.

ड) कामावर असताना कर्मचारी जांभळ्या रंगाचा गणवेष धारण करतील. तसेच त्यांनी नारिंगी रंगाचे परावर्तक जाकिट घातलेल्या गणवेषावर उद्योजक कंपनीचे नाव असावे व त्याचा नमूना संबंधित अधीक्षक अभियंत्यांनी मंजूर केलेला असावा.

ई) रस्त्याचा वापर करणा-यांना कर्मचा-यांकडून नेहमी सौहार्दपूर्ण वागणूक दिली जावी.

फ) कामावर असणा-या कर्मचा-यांची यादी पथकर स्थानकावर लावण्यात यावी.

ग) उद्योजकाने पथकर स्थानकावरील कर्मचा-यांस वेळोवेळी योग्य ते प्रशिक्षण देण्याची व्यवस्था करावी.

(XIII) पथकर स्थानकावर पुरेशी प्रकाश व्यवस्था असावी.

(XIV) प्रत्येक पथकर स्थानकावर चाचणी घेतलेली कार्यक्षम अग्निशमन यंत्रणा असावी.

(XV) प्रत्येक पथकर स्थानकावरील सर्व मार्गिका सकाळी ६ ते रात्री १२ पर्यंत खुल्या ठेवाव्यात आणि रात्री १२ ते सकाळी ६ वाजेपर्यंत कमीत कमी ५० टक्के मार्गिका खुल्या ठेवाव्या.

(XVI) पथकर स्थानक प्रशासकीय कार्यालयामध्ये कूपन व पासेस देण्याकरिता स्वतंत्र खिडकीची व्यवस्था असावी.

(XVII) प्रत्येक पथकर स्थानकावर जवळच्या पोलीस ठाण्याचे ठिकाण, संपर्क साधण्यासाठी संबंधीतांचे नाव / दूरध्वनी क्रमांक, सार्वजनिक रुग्णालयात संपर्क साधण्यासाठी संबंधीतांचे नाव व दूरध्वनी क्रमांक, बाजाराचे ठिकाण, जवळचे शहर आणि या सर्वांचे पथकर स्थानकापासून अंतर दर्शविणारे फलक लावावे.

(XVIII) पथकर स्थानकावर वाहन नादुरुस्त झाल्यास उभी करण्यासाठी, तसेच रस्त्याचा वापर करणा-यांस, तक्रार करावयाची झाल्यास जादा जागा उपलब्ध करुन देण्यात यावी.

(XIX) नादुरुस्त झालेली, मोडलेली/सोडून दिलेली वाहने हलविण्यासाठी पुरेशा क्षमतेची यारी (Crane) पथकर स्थानकावर पुरविण्यात यावी.

(XX) पथकर स्थानकावर दोन्ही बाजूंस प्रत्येकी १५० टन क्षमतेचा इलेक्ट्रॉनिक वजन काटा बसविण्यात यावा.

(XXI) सवलत करारनाम्यातील तरतूदींनुसार चिन्हे दर्शविणारे परावर्तक फलक निर्धारित ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने प्रदर्शित/उभे करण्यात यावे आणि त्यावर निर्धारित माहिती योग्य आकारमानाच्या अक्षरात दर्शविण्यात यावी. सवलत कालावधीमध्ये उद्योजकाने असे फलक दर्शनिय व सुस्थितीत ठेवावे.

(XXII) पथकर स्थानकावर संगणकीय पावती देण्याचे काम वेगाने होण्याच्या दृष्टीने पुरेशा मार्गिका (रस्त्याच्या मार्गीकांच्या संख्येपेक्षा ४ पटीने जास्त) पुरविण्यात याव्या. तसेच आवश्यकतेप्रमाणे बहुमजली व विखुरलेली (staggered) पथकर स्थानके पुरविण्यात यावी व त्याबाबतचा नकाशा मुख्य अभियंता कडून मंजूर करण्यात यावा.

(XXIII) परिशिष्ट-ब नुसार माहिती दर्शविणारे इलेक्ट्रॉनिक फलक सर्व पथकर स्थानकांवर दोन्ही दिशांना दिसतील असे उभारावे.

(XXIV) पथकर स्थानकावरील संगणक संबंधीत विभागाच्या सर्व्हरला जोडण्यात यावा जेणेकरुन पथकर वसूलीच्या माहितीवर विभागास वेळोवेळी देखरेख करता येईल.

(XXV) वाहतूक वर्दळीचे नियंत्रण करण्याच्या दृष्टीने प्रत्येक स्थानकावर कॅमेऱ्याची (सी.सी.टिव्ही) व्यवस्था असावी.

(XXVI) प्रत्येक पथकर स्थानकावर वाहनधारकांच्या मार्गदर्शनासाठी ध्वनीक्षेपकाची व्यवस्था असावी.

(XXVII) प्रत्येक पथकर स्थानकाच्या ठिकाणी स्वतंत्र प्रशासकीय इमारत बांधण्यात यावी.

(XXVIII) प्रत्येक पथकर स्थानकाजवळ स्वतंत्र पोलीस चौकी इमारत उभारण्यांत यावी.

(XXIX) पथकर स्थानकावरील संगणकीय देखरेखीकरिता स्वतंत्र संगणक खोली असावी.

(XXX) उद्योजकाचा अधिकृत पत्ता, संपर्क साधण्यासाठी संबंधिताचे नाव, संपर्कासाठी आवश्यक तपशील प्रत्येक पथकर स्थानकावर प्रदर्शित करण्यात यावा.

(XXXI) संबंधित शासकीय कार्यालयाचा पत्ता, संपर्क साधण्यासाठी संबंधित व्यक्तीचे नाव, संपर्कासाठी आवश्यक तपशील प्रत्येक पथकर स्थानकावर प्रदर्शित करण्यात यावा.

(XXXII) अधिसूचनेची प्रत पथकर स्थानकावर ठेवण्यात यावी व मागणी केल्यास दाखवण्यात यावी.

उपरोक्त सूचनांचे पालन न केल्यास सवलत करारनाम्यामधील अटी व शर्तीनुसार उद्योजकावर दंडात्मक कार्यवाही करण्यात यावी.

**१०. रस्त्याच्या बाजूच्या सोयी सुविधा :**

निविदेत विहित केल्याप्रमाणे रस्त्याच्या दोन्ही बाजूस सोयिस्कर ठिकाणी विश्रांती कक्ष, उपहार गृह, वाहन तळ, वाहन दुरुस्तीसाठीची जागा इ. सोयीसुविधा पुरविण्यात याव्यात.

पथकर स्थानकाजवळ देण्यात येणाऱ्या रस्त्या लगतच्या सोयी-सुविधांकरिता आवश्यक पोचमार्गाची व्यवस्था असावी.

उपरोक्त सोयी-सुविधा न पूरविल्यास सवलत करारनाम्यातील अटी व शर्तीनूसार उद्योजकावर दंडात्मक कार्यवाही करण्यात यावी.

**११. वृक्ष लागवड :**

(I) रस्त्याच्या रुंदीकरणासाठी / प्रकल्प बांधकामासाठी झाडे तोडणे आवश्यक ठरते. सर्वसाधारणपणे जितकी झाडे तोडण्यात येतात त्याच्या दहापट झाडांची लागवड करणे आवश्यक असते. मात्र इतकी झाडे लावण्यासाठी पुरेशी जमीन उपलब्ध नसल्यास निविदेमध्ये विहित केल्यानुसार जमिनीच्या उपलब्ध रुंदीमध्ये दोन झाडांच्या मध्ये निर्धारित केल्याप्रमाणे अंतर ठेवून जास्तीत जास्त झाडे लावण्यात यावीत. तसेच आधुनिक पध्दतीचा वापर करुन झाडांची पूर्नलागवड (Replantation) करण्याची तरतूद निविदेमध्ये अंतर्भूत करण्यात यावी.

(II) लावण्यात येणारी झाडे किमान २ मीटर उंच व निरोगी असावी. झाडांची वाढ होताना त्यांच्या फांद्यांमुळे वाहतुकीस अडथळा येणार नाही याची वेळोवेळी दक्षता घेण्यात यावी.

(III) सवलत कालावधीमध्ये झाडांना पाणी घालण्यात यावे व त्यांची योग्य निगा राखण्यात यावी.

(IV) रस्त्याच्या दुभाजकामध्ये शक्यतो शोभिवंत झाडे व फुलझाडे लावण्यात यावीत व जास्त उंच वाढणार नाहीत तसेच खोड जास्त जाड असणार नाहीत अशा झाडांची निवड करण्यात यावी.

(V) झाडांच्या लागवडीपूर्वी झांडाचे प्रकार, संचालक-उपवने व उद्याने (सा.बां. विभाग) किंवा निविदेत नमूद केलेले तज्ञ अधिकारी किंवा अन्य शासकीय प्राधिकरण यांच्याकडून मंजूर करुन घेण्यात यावेत. झाडांची लागवड रस्त्याच्या कडेस अथवा कार्यकारी अभियंता यानी निर्धारित केलेल्या जागी करण्यात यावी.

(VI) संचालक-उपवने व उद्याने (सा.बां.विभाग) किंवा त्यांचे प्रतिनिधी किंवा निविदेमध्ये नमूद केलेले अधिकारी किंवा अन्य शासकीय प्राधिकरण यांच्या उपस्थितीत दरवर्षी जिवंत असलेल्या झाडांची मोजणी करण्यात यावी.

(VII) जिवंत झाडांची संख्या अभिलेख (वृक्ष लागवडीचा अभिलेख) जतन करण्यात यावा आणि सदर अभिलेख उद्योजक किंवा उद्योजकाचा प्रतिनिधी, संचालक-उपवने व उद्याने किंवा निविदेमध्ये नमूद केलेले अन्य शासकीय प्राधिकरण तथा कार्यकारी अभियंता यांनी साक्षांकित करावा.

(VIII) सवलत कालावधीमध्ये कोणत्याही वेळी जर जिवंत झाडांची संख्या निविदेप्रमाणे नसेल तर उद्योजकावर सवलत करारनाम्यातील तरतूदीनुसार दंड आकारण्यात यावा.

(IX) सवलत कालावधी संपल्यानंतर उद्योजकाने प्रकल्प हस्तांतर करताना जिवंत झाडे ही कार्यकारी अभियंता यांच्याकडे उपवने व उद्याने अधिका-यांच्या किंवा निविदेत नमूद केल्याप्रमाणे तज्ञ अधिकारी समक्ष सुपूर्द करण्यात यावी.

(X) लागवड करावयाच्या झाडांची सर्वसाधारण माहिती **परिशिष्ट-क** मध्ये देण्यात आली आहे.

**१२. प्रकल्प मान्यता :**

(I) प्राथमिक सुसाध्यता अहवालामध्ये (Preliminary Feasibility Report) कामाची व्याप्ती व प्रस्तावित उपभोक्ता शुल्क वसुली स्थानकाच्या नकाशांचा समावेश असावा. त्यानंतर प्रकल्पाच्या सविस्तर सुसाध्यता अहवालास (Detailed Feasibility Report) मुख्य अभियंता यांनी मान्यता द्यावी. तसेच प्रकल्पाच्या सविस्तर अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता देऊन प्रारुप निविदेस संबंधित मुख्य अभियंता यांनी मंजुरी प्रदान करावी. प्रारुप निविदेस मंजूरी देताना परिच्छेद क्र. २० मधील तरतुदींचा समावेश झाल्याची मुख्य अभियंता यांनी खात्री करावी. मुख्य अभियंता यांनी शासनास सविस्तर अहवाल सादर करावा.

(II) ज्या प्रकल्पांना मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या मान्यतेची आवश्यकता आहे असे प्रकल्प मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीकडे प्रशासकीय मान्यतेकरिता सादर करण्यात यावे.

(III) मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीकडे प्रकल्प प्रस्ताव मान्यतेकरीता सादर करण्यापूर्वी सदर प्रकल्प प्रस्ताव आवश्यकतेनुसार राज्य शासनाच्या संबंधित विभागांकडे (वित्त, नियोजन, महसूल, विधि व न्याय विभाग, नगर विकास विभाग, इत्यादि) स्वतंत्ररित्या सहमतीकरिता पाठविण्यात यावा आणि सदर विभागांनी त्यांचे अभिप्राय सदर प्रस्तावास सर्वोच्च प्राधान्य देऊन सा.बां.विभागास तातडीने कळवावे. त्यानंतर सा.बां.विभागाने त्यांच्या अभिप्रायासह व अनुपालासह प्रस्ताव मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीसमोर सादर करावा.

(IV) संबंधित विभागाचे अभिप्राय दोन आठवड्याच्या कालावधीमध्ये प्राप्त झाले नाहीत तर सदर प्रस्ताव मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीस मान्यतेकरिता सादर करण्यात यावा.

(V) आवश्यकतेनूसार असे प्रस्ताव व्यवहार्यता त्रुटींच्या अर्थसहाय्यासाठी (VGF) केंद्र शासनास सादर करण्यात यावे.

**१३. प्रकल्प निविदा मान्यता :**

प्रकल्पाच्या निविदा मंजुरीची कार्यवाही खालीलप्रमाणे तीन टप्प्यात करण्यात यावी.

(I) मुख्य अभियंता यांच्याकडे प्राप्त झालेल्या खाजगीकरण प्रकल्पासाठी पात्र व अर्हताप्राप्त निविदाकाराच्या (Request For Qualification) यादीस शासन स्तरावर मान्यता देण्यात येईल.

(II) उपरोल्लेखित पात्र व अर्हतापात्र निविदाकाराकडून मुख्य निविदा आर्थिक देकार (Request For Proposal) मागविण्यात यावा. आर्थिक देकारासोबत रोकडप्रवाह (Cashflow), तसेच आर्थिक विश्लेषण तपशीलअसलेली सॉफ्ट कॉपी निविदाकाराने निविदेसोबत सादर करावी.

(III) देकार प्राप्त झाल्यानंतर निविदा प्रस्ताव वित्त विभागाच्या सहमतीने शासनाच्या प्रचलित धोरणानुसार प्रकल्प किंमतीच्या आवश्यकतेनुसार मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या मान्यतेस्तव, प्रकल्पासंबंधीच्या नियोजन विभागाच्या मार्गदर्शक सूत्रानुसार, सादर करण्यात यावा.

(IV) आवश्यकतेनूसार निविदा प्रस्ताव मंजुरीकरिता व्यवहार्यता त्रुटी अर्थसहाय्यासाठी (VGF) केंद्र शासनाकडे सादर करण्यात यावा.

**१४. निविदा प्रसिध्दी :**

ई-निविदा पध्दतीने निविदा मागविण्यात याव्या. तसेच निविदा सूचनेस संकेतस्थळावर तसेच प्रसिध्दी विभागामार्फत वर्तमान पत्रात खालील प्रमाणे प्रसिध्दी देण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हा स्तरीय | एका वर्तमानपत्रात |
| २) | राज्य स्तरीय (मराठी) | दोन वर्तमानपत्रात |
| ३) | राज्य स्तरीय (इंग्रजी) | दोन वर्तमानपत्रात |

| | | |
|---|---|---|
| ४) | राष्ट्रीय स्तरावर (इंग्रजी, हिंन्दी) | दोन वर्तमानपत्रात |
| ५) | आंतरराष्ट्रीय स्तरावर (इंग्रजी) | दोन वर्तमानपत्रात |

**१५. निविदा (RFQ, RFP) प्रसिध्दी, विक्री व स्वीकारण्याचा कालावधी नियोजन आयोगाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार व सार्वजनिक खाजगी सहभाग प्रकल्पासाठी तयार करण्यात आलेल्या नमुना करारपत्रानुसार असावा.**

**१६. पूर्वअर्हता निविदा (RFQ)/ निविदा (RFP) छाननी समिती :**

पूर्वअर्हता निविदा (RFQ) / निविदा (RFP) यांची छाननी करण्याकरिता क्षेत्रीय स्तरावर समिती स्थापन करण्यात यावी. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असावी.

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य अभियंता | अध्यक्ष |
| २) | अधीक्षक अभियंता (संबंधित) | सदस्य |
| ३) | अधीक्षक अभियंता (दक्षता व गुणनियंत्रण मंडळ) | सदस्य |
| ४) | विभागीय लेखापाल/सनदी लेखापाल/PPP तज्ञ/आर्थिक सल्लागार/विधि तज्ञ | सदस्य |
| ५) | संबंधीत कार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |

प्रकल्पांच्या निविदा प्राप्त झाल्यानंतर तीन आठवड्याचे आत समितीने अहवाल शासनास सादर करावा.

**१७.** उपभोक्ता शुल्क दर हे रस्त्याच्या लांबीवर म्हणजेच प्रति किमी पद्धतीवर आधारित असावेत. यानुसार उपभोक्ता शुल्क दर परिगणित करण्याची पद्धत व सविस्तर नियम **परिशिष्ट अ** मध्ये देण्यात आले आहेत.

**१८.** प्रत्येक पथकर स्थानकाच्या ठिकाणी उभारण्यात येणा-या डिजिटल फलकावर तसेच संकेत स्थळावर देण्यात येणारी माहिती स्वंतत्रपणे **परिशिष्ट ब** मध्ये देण्यात आलेली आहे.

**१९. तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र :**

(I) ज्या प्रकल्पाला शासन सहभागाची आवश्यकता आहे त्या प्रकल्पाकरीता केंद्र शासनाचा नमूना सवलत करारनामा (Model Concession Agreement) मधील तरतूदीनूसार व इतर प्रकल्पाकरीता काम पूर्ण झाल्यावर सवलत करारनामा तरतूदीनूसार उपभोक्ता शुल्क वसुली सुरु करण्यात यावी. उपभोक्ता शुल्क वसुली प्रस्ताव तात्पूरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र निर्गमित करणेपूर्वी किमान एक महिना अगोदर शासनास सादर करावा.

(II) तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र निर्गमित करण्यापूर्वी सवलत करारनाम्याप्रमाणे प्रकल्पाचे काम पूर्ण झाल्याची खात्री मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी करावी. तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र मुख्य अभियंत्यामार्फत शासनास सादर करण्यात यावे.

(III) उर्वरित कामांची सविस्तर यादी (Punch List) स्वतंत्र अभियंत्याने (Independent Engineer) उद्योजक किंवा उद्योजकाचे प्रतिनिधी आणि संबंधित कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांच्या उपस्थितीत साक्षांकित करावी.

(IV) उर्वरित कामांची सविस्तर यादी (Punch List) कारणांसहित तयार करण्यात यावी. सदर यादीबाबत मुख्य अभियंता यांनी प्रत्यक्ष खात्री करावी.

(V) तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र स्वतंत्र अभियंता, संबंधित कार्यकारी अभियंता आणि अधीक्षक अभियंता यांनी सांक्षांकित करावे. तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र निर्गमित करण्यापूर्वी प्रकल्प वाहतूकीसाठी सुरक्षित आहे याची मुख्य अभियंता यांनी खात्री करुन अभिलेखात नोंद करावी.

(VI) मुख्य अभियंता मार्फत तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यावर शासनाकडून उपभोक्ता शुल्क वसुलीची अधिसूचना काढण्यात येईल.

(VII) अंतिम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र काम पूर्ण झाल्यावर, स्वतंत्र अभियंता, संबंधित कार्यकारी अभियंता आणि अधीक्षक अभियंता यांनी सांक्षांकित करावे. सदर अंतिम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र हे तात्पुरते पूर्णत्वाचे प्रमाणपत्र निर्गमित केल्यापासून ९० दिवसांच्या आत सादर करण्यात यावे अन्यथा सवलत करारनामा अटी व शर्तीनुसार उद्योजकावर कार्यवाही करण्यात यावी. अंतिम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र मुख्य अभियंता यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावे.

(VIII) (अ) निविदेतील अटी व शर्तीनूसार प्रकल्पाचे काम अपूर्ण राहण्यास उद्योजक जबाबदार असल्यामूळे मुख्य अभियंता अंतिम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र न देऊ शकल्यास प्रकल्पाचे काम पूर्ण होईपर्यन्त व अंतिम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र निर्गमित होईपर्यन्त उपभोक्ता शुल्क वसुलीस स्थगिती देण्यात यावी.

(ब) निविदेतील अटी व शर्तीनूसार प्रकल्पाचे काम अपूर्ण राहण्यास शासन जबाबदार असल्यास त्याबाबतची कारणे मुख्य अभियंत्यानी नमूद करुन उपभोक्ता शुल्क वसुली सुरु ठेवण्यासंबंधी प्रस्ताव शासनास सादर करावा.

## २०. प्रकल्पाची देखभाल व दुरुस्ती :

(I) बांधकाम कालावधीमध्ये प्रकल्प रस्ता / बांधकामे यांची देखभाल दुरुस्ती उद्योजकाने योग्य प्रकारे विहित कालावधीत करावी व तसे त्याने न केल्यास निविदेतील तरतूदीनुसार तत्काळ कारवाई करण्यात यावी.

(II) संपूर्ण सवलत कालावधीत सवलत करारनाम्यातील तरतूदीनुसार रस्ता सुस्थितीत ठेवण्याची उद्योजकाने खबरदारी घ्यावी. तसेच सवलत करारनाम्यातील तरतुदीनूसार उद्योजकाने संपूर्ण प्रकल्प रस्ता सवलत कालावधीमध्ये वाहतुकीस योग्य तसेच निर्धारित सेवा पातळी (Level of Service) राखावी. यासंदर्भात उद्योजकाने कराराचे अनुपालन न करता निष्काळजीपणा दर्शविल्यास व त्यामुळे रस्त्यावर खड्डे पडून अथवा अन्य कारणांमूळे रस्ता वाहतूकीस अयोग्य असल्यास तसेच वाहतूकदारांना गैरसोय निर्माण झाल्यास मुख्य अभियंता यांनी रस्ता सुस्थितीत होईपर्यंत उपभोक्ता शुल्क वसूलीस स्थगिती द्यावी.

(III) सवलत करारनाम्यातील तरतुदींनुसार उद्योजकाने प्रकल्प रस्ता / बांधकामे यांची सुरक्षेबाबतचे सर्व नियमांचे पालन करावे तसेच रस्ते सुरक्षिततेच्या तरतूदीनुसार संपूर्ण सवलत कालावधीत माहिती फलक, परावर्तक सूचना फलक, साईन बोर्ड, इत्यादि सुस्थितीत ठेऊन कायम दृष्टीपथात ठेवण्याची खबरदारी घ्यावी. तसेच वेळोवेळी अपघातामुळे अथवा अन्य कारणामुळे त्यांची तुटफुट झाल्यास उद्योजकाने सदर फलक त्वरीत नव्याने उभारावे व ते सदैव स्वच्छ राहतील याची दक्षता घ्यावी.

(IV) उद्योजकाने सर्वसाधारण देखभाल दुरुस्ती व विशेष देखभाल दुरुस्ती ही सवलत करारनाम्यात विहित केलेल्या कालावधीत करणे आवश्यक आहे. तसे न केल्यास करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार रस्ता सुस्थितीत येईपर्यंत मुख्य अभियंता उपभोक्ता शुल्काच्या वसुलीस स्थगिती देतील.

(V) अशा उपभोक्ता शुल्काच्या वसुली स्थगितीबद्दल उद्योजकास कोणतीही नुकसानभरपाई देय होणार नाही. उद्योजकाने सदर दुरुस्ती निर्धारित वेळेत न केल्यास उद्योजकाच्या जबाबदारीवर व खर्चाने विभागामार्फत करण्यात यावी व त्यासंबंधी झालेला खर्च उद्योजकाकडून ७५% अधिक दरासह (दंडनीय दर) वसूल करण्यात यावा. सदर खर्चासंबंधी कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी दिलेले प्रमाणपत्र हे अंतिम राहील व ते उद्योजकावर बंधनकारक असेल.

**२१. व्यवहार्यता त्रुटी अर्थसहाय्य (Vability Gap Funding) :**

केंद्र शासनाच्या धोरणाप्रमाणे सार्वजनिक खाजगी सहभाग प्रकल्पांमधील व्यवहार्यता त्रुटींपोटी (Vability Gap Funding) प्रकल्प खर्चाच्या ४०% पर्यंत (२०% केंद्र शासनाकडून व उर्वरित हिस्सा महाराष्ट्र शासनाकडून) अर्थसहाय्य देण्यात येते. अशा प्रकारच्या प्रकल्पांसाठी केंद्र शासनाच्या नियोजन आयोगाने तयार केलेल्या नमुना सवलत करारनाम्याचा (Model Concession Agreement) वापर करणे अनिवार्य आहे. केंद्र शासनाने विहित केलेल्या अटी व शर्तींचे पालन करणे आवश्यक असून त्यामध्ये कोणताही फेरफार अनुज्ञेय नाही. त्याचप्रमाणे याबाबत केंद्र शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनेचे अनुपालन करणे बंधनकारक राहील.

**२२.** अ) कार्यान्वित असलेल्या प्रकल्पांसाठी सवलत करारनाम्यातील अटी व शर्तींनुसार उपभोक्ता शुल्क आकारण्यात येईल.

ब) भविष्यात हाती घेण्यासाठी Viability Gap Funding आवश्यक असणा-या प्रकल्पांसाठी उपभोक्ता शुल्काचे दर कि.मी. तत्त्वावर आधारित राहील. याबाबत तपशीलवार मार्गदर्शक सूचना **परिशिष्ट-अ** मध्ये देण्यात आल्या आहेत.

**२३.** सदर धोरणामधील कोणताही मुद्दा, निविदेतील कोणत्याही अटी व शर्तीशी विसंगत आढळून आल्यास निविदेतील अटी व शर्ती अंतिम समजण्यात याव्यात.

**२४.** या शासन निर्णयातील तरतूदी दिनांक ३१.०७.२०१४ नंतर हाती घेण्यात येणा-या प्रकल्पांकरिता लागू राहतील.

सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०९१११३३६०७७८१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Natthuji Dekate

Digitally signed by Mahesh Natthuji Dekate
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Natthuji Dekate
Date: 2014.09.11 13:39:45 +05'30'

**म. न. डेकाटे**
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव.

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव / मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

३) मा.मंत्री सा.बां. विभाग यांचे खाजगी सचिव / मा.मंत्री सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव / सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

५) अप्पर मुख्य सचिव (नियोजन) / अप्पर मुख्य सचिव (वित्त) / अप्पर मुख्य सचिव (महसूल).

६) प्रधान सचिव (परिवहन) / प्रधान सचिव (उर्जा) / प्रधान सचिव (जलसंपदा) / प्रधान सचिव (नगर विकास) / प्रधान सचिव (उद्योग) / प्रधान सचिव (विधी व न्याय).

७) सचिव(बांधकामे) / सचिव(रस्ते) सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ (मर्या.),मुंबई

९) केंद्र शासनाचे सचिव, सहसचिव (Infrastructure and Investment), आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालय, MORTH, केंद्र शासन / सह संचालक, PPP cell, आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालय.

१०) अध्यक्ष, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, नवी दिल्ली / मुख्य महाव्यवस्थापक, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र.

११) महालेखापाल-१(लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

१२) महालेखापाल-२(लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा अधिकारी,मुंबई.

१४) सर्व विभागीय आयुक्त

१५) सर्व जिल्हाधिकारी.

१६) सर्व मुख्य अभियंता / मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग कोंकण भवन, नवी मुंबई / सर्व अधीक्षक अभियंता / सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.

१७) सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता/सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ.

१८) सर्व उपसचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९) निवासी अभियंता, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.

२०) कार्यासन रस्ते-९, कार्यासन रस्ते-९अ, कार्यासन रस्ते-८, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट -अ

## उपभोक्ता शुल्काचे दर व संबंधित बाबी विषयक नियमावली

**१. व्याख्या :**

(I) "आधारभूत वर्ष" म्हणजे दि. १ एप्रिल २००७ ते ३१ मार्च २००८ हा कालावधी;

(II) "बांधा, वापरा व हस्तांतरित करा प्रकल्प"म्हणजे यथा प्रकार रस्ता, कायमस्वरूपी पूल, वळण रस्ता अथवा भुयारी मार्ग यांच्याशी संबंधित प्रकल्प रस्त्याच्या एखाद्या भागाच्या बांधकामासाठी उद्योजकाबरोबर करार करण्यात आलेला आहे असा प्रकल्प;

(III) "वळण रस्ता" म्हणजे एखादे गाव अथवा शहराबाहेरुन जाणा-या रस्त्याचा भाग;

(IV) "उद्योजक" म्हणजे ज्यांनी महाराष्ट्र शासनाबरोबर सवलत कराराचा केला आहे अशी व्यक्ती/चमू/विशेष प्रयोजन संस्था/ संयुक्त उपक्रम;

(V) "उन्नत महामार्ग "म्हणजे स्तंभ अथवा भिंतीच्या आधारे जमीन पातळीच्या वर उचललेला रस्त्याचा भाग;

(VI) "अंमलबजावणी प्राधिकारी" म्हणजे महाराष्ट्र शासनाने अधिघोषित केलेला एखादा अधिकारी अथवा प्राधिकरण;

(VII) "द्रुतमार्ग" म्हणजे वेगवान वाहतुकीस व नियंत्रित प्रवेशास सुयोग्य असा दुभाजित वाहनमार्ग असलेला रस्ता;

(VIII) " आर्थिक वर्ष" म्हणजे एखाद्या वर्षाच्या १ एप्रिल रोजी सुरु होऊन पुढील वर्षाच्या ३१ मार्च रोजी समाप्त होणारे वर्ष;

(IX) एखाद्या वाहनाच्या बाबत " एकूण वाहनभार" म्हणजे त्या वाहनाचे एकूण वजन आणि मोटार वाहन अधिनियम, १९८८ (१९८८ चा ५९) अन्वये नोंदणी प्राधिका-याने अनुज्ञेय म्हणून प्रमाणित आणि नोंदणीकृत केलेले वाहनाचे मालासह वजन;

(X) "मार्गिका" म्हणजे मुख्य वाहनमार्गाचा भाग असलेली व किमान ३.५० मीटर रुंदी असलेली मार्गिका;

(XI) "यांत्रिकी वाहन "म्हणजे स्वयंप्रेरणेने चालविण्यात येणारे एखादे वाहन ज्यामध्ये मोटार वाहन अधिनियम, १९८८ (५९/१९८८) मध्ये केलेल्या व्याख्येनुसार असलेले वाहन समाविष्ट असेल;

(XII) " अधिसूचना" म्हणजे अधिकृत राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेली अधिसूचना;

(XIII) "खाजगी गुंतवणूक प्रकल्प" म्हणजे ज्यासाठी यथा प्रकार प्रकल्प रस्ता, कायमस्वरूपी पूल, रेल्वे खालून जाणारे मार्ग, वळण रस्ता अथवा भुयारी मार्ग यांच्या भागासंबंधात उद्योजकाबरोबर सवलत करारनामा करण्यात आला आहे असा प्रकल्प;

(XIV) "पथकर संकूल" म्हणजे उपभोक्ता शुल्क संकलनासाठी बांधण्यात आलेली एखादी इमारत/इमारती, गाळयाचे बांधकाम;

(XV) "उपभोक्ता शुल्क" म्हणजे रस्त्याचा वापर करणा-या विविध प्रकारच्या वाहनांकडून वसूल करण्यात आलेले शुल्क;

**२. उपभोक्ता शुल्क आकारणी :**

(I) प्रस्तुत नियमांमधील तरतूदींस अनुसरुन महाराष्ट्र शासन हे प्रकल्परस्ता, कायमस्वरुपी पूल, वळण रस्ता अथवा भुयारी मार्गाच्या एखाद्या भागाचा वापर करण्याबद्दल अधिसूचनेद्वारे उपभोक्ता शुल्क लागू करु शकेल.

अंमलबजावणी प्राधिकारी अथवा राज्य शासन यांच्या नियंत्रणाबाहेरील परिस्थितीमुळे काही मोठे बांधकामे (स्ट्रक्चर्स) जसे की भुयारी मार्ग, नदीवरील पुल, सागरी सेतु, उड्डाण पुल, रेल्वे उड्डाणपुल इ. ज्यांची लांबी ६० मीटर अथवा त्याहून जास्त आहे यांचे बांधकाम अपूर्ण राहिले असल्यास सदर प्रकल्प रस्त्याचा वापर करण्याबद्दल राज्य शासन अधिसूचनेद्वारे कमी दराने शुल्क लागु करु शकेल. मात्र त्यासाठी रस्त्याच्या बांधकामाचा पूर्ण झालेला भाग वाहतुकीस योग्य असला पाहिजे.

(II) वरील उपकलम (I) नुसार करावयाचे उपभोक्ता शुल्क संकलन उद्योजकाबरोबर करण्यात आलेल्या सवलत करारातील अटी व शर्तीनुसार असेल.

(III) यथास्थिती रस्ता मार्ग, कायमस्वरुपी पूल, वळण रस्ता अथवा भुयारी मार्ग यांच्या भागाचा वापर करणा-या दोन चाकी, तीन चाकी वाहने, रिकामे ट्रॅक्टर व पशुकडून ओढून नेल्या जाणा-या वाहनांना उपभोक्ता शुल्क लागू होणार नाही.

(IV) प्रस्तुत नियमानुसार राज्य शासनाने अधिसूचित केलेले उपभोक्ता शुल्क लगतच्या पाच रुपयांच्या पटीत असेल. दरवर्षी शुल्काची फेरगणना करताना मूळ उपभोक्ता शुल्क विचारात घ्यावे.

**३. उपभोक्ता शुल्कासाठी आधारभूत दर :**

(I) सार्वजनिक खाजगी सहभाग तत्त्वावर बांधण्यात आलेला रस्ता, कायमस्वरुपी पूल, वळण रस्ता अथवा भुयारी मार्ग यांसाठीचे उपभोक्ता शुल्क समान असेल. उपभोक्ता शुल्क या

शासन निर्णयाच्या परिच्छेद ३(II) मध्ये नमूद केलेल्या एकूण प्रकल्प किंमतीवर (TPC) लागू राहील.

(II) चार अथवा त्याहून जास्त मार्गिका असलेल्या रस्त्याच्या एखाद्या भागासाठी सन २००७-२००८ या आधारभूत वर्षासाठीच्या उपभोक्ता शुल्काची परिगणना म्हणजे अशा भागाची लांबी गुणिले खालील दर अशी असेल:-

| अ. क्र. | वाहनाचा प्रकार | प्रति कि.मी. साठी उपभोक्ता शुल्काचा आधारभूत दर (रुपयामध्ये) |
|---|---|---|
| (अ) | मोटार, जीप, व्हॅन अथवा हलकी मोटार वाहने | ०.५० |
| (ब) | हलकी भाडोत्री वाहने, हलकी मालवाहतुकीची वाहने अथवा मिनी बस | १.०५ |
| (क) | बस अथवा ट्रक (२ असांचे) | २.२० |
| (ड) | तीन आसांची भाडोत्री वाहने | २.४० |
| (ई) | अवजड बांधकाम यंत्रसामग्री (एचसीएम) अथवा जमीन खोदाई-संयंत्रे (ईएमई) अथवा अनेक आसांची वाहने (एमएव्ही) (चार अथवा सहा आसांची) | ३.४५ |
| (फ) | अति अवजड वाहने (सात किंवा जास्त आसांची) | ४.२० |

अ) "मोटार" अथवा" जीप" अथवा "व्हॅन" अथवा "हलके मोटार वाहन" म्हणजे कोणतेही यांत्रिक वाहन ज्याचे एकूण वजन सात हजार पाचशे कि.ग्रॅ. पेक्षा जास्त नसेल अथवा मोटार वाहन अधिनियम, १९८८ अन्वये देण्यात आलेल्या प्रमाणपत्रामध्ये निर्धारित केलेली नोंदणीकृत प्रवासी क्षमता चालक वगळता बारा पेक्षा जास्त नसेल.

ब) "हलके भाडोत्री वाहन" अथवा " हलके मालवाहू वाहन" अथवा "मिनी बस" म्हणजे कोणतेही यांत्रिक वाहन ज्याचे एकूण वजन सात हजार पाचशे कि.ग्रॅ. पेक्षा जास्त परंतु बारा हजार कि.ग्रॅ. पेक्षा कमी असेल अथवा मोटार वाहन अधिनियम १९८८ अन्वये देण्यात आलेल्या प्रमाणपत्रामध्ये निर्धारित केलेली नोंदणीकृत प्रवासी क्षमता चालक वगळून बारापेक्षा जास्त परंतु बत्तीसपेक्षा जास्त नसेल.

क) "ट्रक" अथवा "बस" म्हणजे कोणतेही यांत्रिकी वाहन ज्याचे एकूण वजन बारा हजार कि.ग्रॅ. पेक्षा जास्त परंतु वीस हजार कि.ग्रॅ. पेक्षा कमी असेल अथवा मोटार वाहन

